व्यवसायकराचे नोंदणीकरण आणि नाव नोंदणीकरण करुन घेणा-या आस्थापना/व्यक्ती तसेच नोंदणीकरण/नांव नोंदणीकरण करून घेतलेल्या आस्थापना/व्यक्ती यांनी दि. १ एप्रिल, १९९२ ते दि. ३० एप्रिल, १९९२ या कालावधीत कर भरणा केल्यास कायद्यानुसार लागू होणारी शास्ती, व्याज आणि दंडनीय कार्यवाही [प्रॉसिक्युशन] यामध्ये सवलत मंजूर करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्र. व्यकर ११९२/प्र.क्र. १६/कराधान-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च १९९२.

संदर्भ : १] शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. व्यकर-११९२/प्र.क्र. १६/ कराधान-३, दि. १८ फेब्रुवारी, १९९२.
२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. व्यकर ११९२/प्र.क्र. १६/ कराधान-३, दि. २१ फेब्रुवारी १९९२.

प्रास्ताविक :-

महाराष्ट्र राज्यातील व्यवसाय कर अधिनियम, १९७५ अन्वये व्यवसाय कराचे नोंदणीकरण अथवा नांव नोंदणीकरण करून घेण्यास पात्र असलेल्या आस्थापना आणि व्यक्ती यांनी दि. १ मार्च, १९९२ ते दि. ३१ मार्च, १९९२ या कालावधीत नोंदणीकरण व नांव नोंदणीकरण करून घेऊन व्यवसाय कराची देय रक्कम भरणा केल्यास तसेच व्यवसायकराची देय थकबाकी भरणा न केलेल्या कसूरदार व्यक्तींनी याच कालावधीत कर भरणा केल्यास सदर कायद्यानुसार लागू होणारी शास्ती, व्याज आणि दंडनीय कार्यवाही [प्रॉसिक्युशन] यामधून संपूर्णपणे माफी देण्याची योजना संदर्भ म्हणून नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यांत आली होती. व्यवसाय कर आयुक्तांच्या दि. ३० मार्च, १९९२ च्या अहवालानुसार असे निदर्शनास आले आहे की या प्रोत्साहन योजनेस महाराष्ट्र राज्यात उत्तम प्रतिसाद मिळालेला आहे. तथापि, या योजनेची अंमलबजावणी प्रामुख्याने जिल्हास्तरावर झालेली असून तालुका स्तरावर सदर योजनेची माहिती उशीरा मिळाल्यामुळे पुरेसा प्रतिसाद मिळालेला दिसत नाही. म्हणून तालुका स्तरावर सुध्दा या योजनेची प्रसिध्दी होण्याची गरज आहे. याद्रुष्टीने सदर योजनेला आणखी एक महिना मुदतवाढ देणे आवश्यक असल्याचे प्रतिपादन विक्रीकर आयुक्तांनी केलेले आहे.

याशिवाय दि. १ मार्च, १९९२ ते दि. ३१ मार्च, १९९२ या कालावधीसाठी मंजूर केलेल्या प्रोत्साहन योजनेमध्ये नव्याने नोंदवून घेणा-या मालक/आस्थापनांना शास्ती, व्याज आणि दंडनीय कार्यवाही माफीची सवलत देण्यांत आली असतांना कसूरदार नोंदणीधारकांचा [मालक आणि आस्थापना] समावेश करण्यांत आलेला नव्हता या संदर्भात निरनिराळ्या स्तरांवरुन प्राप्त झालेल्या सूचनांचा विचार केल्यानंतर या योजनेचा लाभ १ मार्च, १९९२ पूर्वी नोंदून घेतलेल्या परंतु कर भरण्यांत कसूरदार असलेल्या मालक/आस्थापना यांना सुध्दा लागू करण्याची आवश्यकता निर्माण झाली

आहे. तदनुसार शासन या योजनेबाबतीत खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

शासन निर्णय :-

१] नव्याने नोंदून घेणारे मालक/आस्थापना आणि नव्याने नाव नोंदवून घेणा-या व्यक्ती व संस्था आणि कर कसूरदार व्यक्ती यांना दि. १ मार्च १९९२ ते दि. ३१, मार्च १९९२ या कालावधीसाठी लागू केलेली शास्ती, व्याज आणि दंडनीय कार्यवाही माफीची प्रोत्साहन योजना आणखी एक महिना कालावधीसाठी म्हणजे दि. १ एप्रिल १९९२ ते दिनांक ३० एप्रिल १९९२ या कालावधीसाठी लागू करण्यांत यावी.

२] महाराष्ट्र व्यवसाय, व्यापार, अजिविका आणि नोक-या यावरील कर अधिनियम, १९७५ अन्वये दि. १ मार्च १९९२ पूर्वी नोंदणीकरण करुन घेतलेल्या परंतु ३१ मार्च, १९९२ अखेरपर्यंत व्यवसायकराची विवरणपत्रे दाखल न केलेल्या आणि निर्धारणा अथवा विवरणाप्रमाणे कर भरणा न केलेल्या मालक/आस्थापना यांनी दि. १ एप्रिल १९९२ ते दि. ३० एप्रिल १९९२ या कालावधीमध्ये व्यवसाय कराची निर्धारणेनुसार देय असलेली अथवा विवरणपत्रे दाखल करुन देय असलेली संपूर्ण मूळ कराची रक्कम व व्याजापैकी ५० टक्के रक्कम भरणा केल्यास व्यवसायकर कायद्यानुसार लागू होणारी शास्ती व उर्वरित ५० टक्के व्याज संपूर्णपणे माफ करण्यात यावे. तसेच अशा मालक/आस्थापनांवर कायद्यानुसार कोणतीही दंडनीय कार्यवाही [प्रॉसिक्यूशन] करण्यांत येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[बी. सी. खटुआ]
शासनाचे सह सचिव,
वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित :-

१] महालेखापाल [लेखा परीक्षा]-एक, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०

२] महालेखापाल [लेखा परीक्षा]-दोन, महाराष्ट्र, नागपूर

३] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

४] व्यवसायकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०००१०

५] रजिस्ट्रार, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०००१०

६] कराधान-३ [निवड नस्ती]